**केंद्र पुरस्कृत आम आदमी विमा योजनेमधील लाभार्थ्यांची नोंदणी, शिष्यवृत्तीची नोंदणी व दाव्यांची भरपाई इ. कामे गाव पातळीवरील स्वसहाय्यता गट (Self Help Group) / बचत गटास / महा ई-सेवा केंद्र यांचेकडून करून घेणे.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय क्रमांक : आआवि. २०११ / प्र. क्र. १३४ / विसयो-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३१ ऑक्टोबर २०११.

**वाचा :** (१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : आआवि. २००७ / प्र. क्र. ३५६ / विसयो, दिनांक १६ ऑक्टोबर २००७.

(२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : आआवि. २०१० प्र. क्र. २२६ / विसयो-२, दिनांक ८ जून २०११.

(३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : आआवि. २०१० / प्र. क्र. २२६ / विसयो-२, दिनांक १५ जून २०११.

**प्रस्तावना :**

ग्रामीण भागातील भूमिहीन कुटूंबातील प्रमुख कमावत्या व्यक्तीस विम्याचे संरक्षण पुरविण्यासाठी राज्यात आम आदमी विमा योजना राबविण्यात येत आहे. १८ ते ५९ वयोगटातील भूमिहिन कुटूंबातील रोजगार करणारा कुटूंब प्रमुख किंवा त्या कुटूंबातील एक प्रमुख कमावती व्यक्ती यांचा या योजनेअंतर्गत भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून विमा उतरविला जातो. केंद्र शासनाकडून रुपये १००/- व राज्य शासनाकडून रुपये १००/- इतकी रक्कम प्रति लाभार्थी वार्षिक विमा हप्त्यापोटी भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे भरण्यात येते. तसेच लाभार्थ्यांच्या ९ वी ते १२ वी इयत्तेत शिकणाऱ्या दोन मुलांना भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून प्रति तिमाही प्रती मुलास रुपये ३००/- इतकी शिष्यवृत्ती देण्यात येते. आम आदमी विमा योजनेकरिता ५ एकर पेक्षा कमी जिरायती व २.५ एकर पेक्षा कमी बागायती शेत जमीन धारण करीत असलेली व्यक्ती भूमिहीन समजण्यात येते. या योजनेअंतर्गत जास्तीत जास्त लाभार्थ्यांची नोंदणी होण्यासाठी, लाभार्थ्यांच्या मुलांना शिष्यवृत्ती मिळण्यासाठी तसेच दावा भरपाईची प्रकरणे तातडीने निकाली काढण्याकरिता व लाभार्थ्यांना तत्परतेने सुविधा उपलब्ध होण्याकरिता ही कामे गावपातळीवरील स्वसहायता गट / बचत गट / महा ई-सेवा केंद्र यांच्या मार्फत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आम आदमी विमा योजनेअंतर्गत लाभार्थ्यांची नोंदणी, शिष्यवृत्तीची नोंदणी व दाव्यांची भरपाई इत्यादी कामे गाव पातळीवरील स्वसहाय्यता गटास (Self Help Group) / बचत गट / महा ई-सेवा केंद्र यांचेमार्फत सशुल्क करून घेण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. जिल्हा प्रकल्प संचालक व जिल्हास्तर संजय गांधी योजना कार्यालय प्रमुख प्रत्येक तालुक्यात किती लाभार्थी आहेत व खेडेनिहाय किती लाभार्थी आहेत याची माहिती संकलित करतील. एका महसुली खेड्याकरिता किमान १ बचत गट असावा. एका बचत गटास जास्तीत जास्त २०० लाभार्थी द्यावेत मात्र ज्या खेड्यात २०० पेक्षा जास्त लाभार्थी असतील तेथे एका पेक्षा जास्त बचत गटांची संख्या निश्चित करावी. दिनांक १ फेब्रुवारी ते २८ फेब्रुवारी २०१२ या कालावधीत बचत गट व त्यांना द्यावयाची लाभार्थी संख्या याचा आराखडा निश्चित करण्यात यावा.

३. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा यांनी संजय गांधी निराधार अनुदान योजना कार्यालयाच्या सहकार्याने दिनांक १ डिसेंबर २०११ ते ३१ जानेवारी २०१२ पर्यंत सुयोग्य बचत गटांची निवड करावी. याकरिता स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात देऊन इच्छुक बचत गटांकडून विहित नमुन्यात अर्ज भरून घ्यावेत. जिल्हा स्तरावरील संजय गांधी निराधार अनुदान योजना कार्यालयामार्फत आवश्यक ते मनुष्यबळ उपलब्ध करून देण्यात यावे. जाहिरातीचा खर्च आम आदमी विमा योजनेच्या प्रशासकीय खर्चातून करण्यात यावा. सदर अर्जांची छाननी करून सक्षम बचत गटांची निवड करावी. अशाप्रकारे निवड करण्यात आलेल्या बचत गटांची निवड ३ वर्षांकरिता असेल. समाधानकारक व सुयोग्य काम करणाऱ्या बचत गटांची निवड पुढे चालू ठेवण्यात येईल.

४. दिनांक ३१ डिसेंबर २०११ पर्यंत सर्व तलाठ्यांनी त्यांच्या क्षेत्रातील सर्व आम आदमी विमा अर्ज लाभार्थ्यांकडून व्यवस्थित भरून घेणे, एल. आय. सी. संस्थेला पाठविणे व त्यांचे प्रमाणपत्र मिळविणे ही कार्यवाही पूर्ण करावी. दिनांक १ मार्च ते ३१ मार्च २०१२ या कालावधीमध्ये महसूल यंत्रणेने राज्यातील सर्व लाभार्थ्यांचे अर्ज भरून घेतले आहेत व विमा संस्थेकडून प्रमाणपत्र मिळविले आहे, तसेच ते लाभार्थ्यांनाही दिलेले आहेत याची खात्री करावी किंवा ज्या ठिकाणी अनुशेष असेल त्या ठिकाणी युद्धपातळीवर हा अनुशेष पूर्ण करण्यात यावा.

५. दिनांक १ एप्रिल ते ३० एप्रिल,२०१२ या कालावधीमध्ये तहसील कार्यालयाने तलाठीनिहाय व तलाठी अंतर्गत ज्या बचत गटांना हे अर्ज हस्तांतर करावयाचे आहेत ते अर्ज व त्याची व्यवस्थित नोंद केलेले दोन रजिस्टर (३ प्रतीत) तयार करावे. बचत गटास द्यावयाचे रजिस्टर तसेच त्यामध्ये नोंद केलेले सर्व अर्ज बचत गटास हस्तांतरित करून, त्याच्या योग्य नोंदी व स्वाक्षऱ्या घ्याव्यात. (हे रजिस्टर बचत गटाने तयार करावे व त्यामधील नोंदी तलाठी / तहसील कार्यालयाने तपासून प्रमाणित कराव्यात.)

६. बचत गटांची निवड खालील निकषांच्या आधारे करण्यात यावी. :-

(१) बचत गट Key Activity साठी पात्र असावेत.

(२) बचत गटामध्ये १० ते १५ सदस्य असावेत.

(३) गाव पातळीवरील बचत गटांपैकी सक्षम महिला बचत गटांना प्राधान्य देण्यात यावे.

(४) जेथे सक्षम महिला बचत गट नसतील तेथे इतर बचत गटांची निवड करण्यात यावी.

(५) अशा प्रकारे निवड केलेल्या बचत गटांना भविष्यात त्यांना संगणकावर ऑनलाईन पद्धतीने काम करावे लागेल याबाबत त्यांना अवगत करावे.

७. बचत गटांची निवड झाल्यानंतर त्यांना तहसीलदार (संगायो) यांचेकडून भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या अधिकाऱ्यांच्या सहयोगाने नोंदणी कशी करावी, शिष्यवृत्तीचा अर्ज कसा भरावा व भरपाई दावा कशाप्रकारे तयार करावा, बचत गटांच्या जबाबदाऱ्या काय राहतील याचे प्रशिक्षण देण्यात येईल. या बचत गटांना क्षेत्रिय स्तरावर तलाठी, मंडळ अधिकारी, तहसीलदार या महसुली यंत्रणेकडून आवश्यक ते सहाय्य करण्यात येईल. बचत गटांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रातील सर्व लाभार्थ्यांना सेवा पुरविणे बचत गटांवर बंधनकारक असेल.

८. संबंधित गावातील तलाठी त्यांच्याकडे असलेल्या अभिलेखावरून गावातील अल्पभूधारक व्यक्तींची यादी बचत गटांना उपलब्ध करून देतील. बचत गट त्यांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रातील लाभार्थ्यांकडून विहित नमुन्यातील अर्ज भरून घेतील. अर्जासोबत आवश्यक असलेली कागदपत्रे मिळविण्यात लाभार्थ्यांना मदत करतील. लाभार्थ्यांकडून भरून घेण्यात आलेले परिपूर्ण अर्ज तलाठ्यांकडे पुढील कार्यवाहीकरिता सादर करतील. अर्जाबाबत कोणतीही त्रुटी असल्यास त्याची पूर्तता करण्याची जबाबदारी बचत गटांची असेल. बचत गटांमार्फत तलाठ्यांकडे सादर केलेले अर्ज आठ दिवसात तहसीलदार कार्यालयांकडे तलाठ्यांनी पोहोचवावेत. तहसीलदार कार्यालयांनी तलाठ्यांकडून प्राप्त झालेले अर्ज भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या संबंधित क्षेत्रिय कार्यालयाकडे आठ दिवसात

पाठवावेत. एक महिन्याच्या कालावधीत तहसीलदार कार्यालयांनी भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या संबंधित क्षेत्रिय कार्यालयाकडून विमा प्रमाणपत्रे उपलब्ध करून घ्यावीत. ही प्रमाणपत्रे तहसीलदार कार्यालयांमधून बचत गटामार्फत लाभार्थ्यांना पोहोचविण्यात यावीत.

९. ज्यावेळी दाव्याचे प्रकरण उद्‌भवेल त्यावेळी बचत गट दाव्याचा अर्ज लाभार्थ्याकडून / वारसाकडून भरून घेऊन सर्व आवश्यक त्या कागदपत्रांसह तलाठ्यामार्फत तहसीलदार संगायो, कार्यालय यांचेकडे पाठवावा. तहसीलदार भरपाईचा दावा भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या संबंधित कार्यालयाकडे पाठवतील. संजय गांधी निराधार अनुदान योजना कार्यालय व त्याचा तपशील (सेवाशुल्काच्या रकमेसह) जिल्हाधिकारी यांचेकडे पाठवतील. दावा मंजूर करण्यासाठी भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित तहसीलदार संगायो, कार्यालय तसेच संबंधित बचत गटाची राहील. दावा मंजूर झाल्यानंतर भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून भरपाईची रक्कम लाभार्थी / वारस यांचे बँक खात्यात थेट जमा झाल्यावर बचत गटांना सेवाशुल्क अदा करण्यात येईल. भारतीय आयुर्विमा महामंडळाने भरपाई दाव्यात काही त्रुटी काढल्यास त्याची पूर्तता करण्याची जबाबदारी बचत गटाची राहील. दावा निकाली काढल्यानंतर दाव्यापोटीच्या रकमेचा धनादेश तहसीलदार कार्यालयाने तलाठ्यांमार्फत बचत गटांकडे सूपुर्द करावेत. बचत गटांनी ह्या धनादेशांचे वाटप प्रत्यक्ष लाभार्थ्याला २ दिवसांच्या आत करावे.

१०. लाभार्थ्यांचे अर्ज भरून घेताना शिष्यवृत्तीकरिता पात्र असलेल्या त्यांच्या मुलांचे अर्ज देखील बचत गटांनी भरून घ्यावेत. असे अर्ज भरताना आवश्यक असलेली कागदपत्रे मिळविण्याकरिता बचत गटांनी लाभार्थ्यांस सहकार्य करावे. दिनांक १ जानेवारी २०१२ पूर्वी ज्या लाभार्थ्यांचे अर्ज तलाठ्यांमार्फत भरण्यात आलेले आहेत, अशा लाभार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरिता पात्र असलेल्या व अद्याप लाभ सुरू न झालेल्या मुलांचा शोध बचत गटांनी घेऊन वरील प्रमाणेच त्यांचे परिपूर्ण अर्ज तलाठ्यांमार्फत तहसीलदार कार्यालयाकडे सादर करावेत.

११. विद्यार्थ्यांचे शिष्यवृत्तीचे अर्ज भरणे व शिष्यवृत्ती मंजुरीकरिता या बचत गटांना माध्यमिक / उच्च माध्यमिक शाळांचे शिक्षक, मुख्याध्यापक सहकार्य करतील. याचे नियंत्रण उपसंचालक व शिक्षणाधिकारी, माध्यमिक / उच्च माध्यमिक यांनी करावे.

१२. लाभार्थ्यांच्या नोंदणीपोटी स्वसहाय्यता गट / बचत गट प्रति लाभार्थी रुपये २०/- नोंदणी शुल्क व दरवर्षी रुपये २०/- नुतनीकरणाकरिता सेवाशुल्क लाभार्थ्यांकडून आकारतील. तसेच शिष्यवृत्ती नोंदणीसाठी प्रत्येक विद्यार्थ्यामागे दरवर्षी रुपये १०/- इतके सेवाशुल्क संबंधित लाभार्थ्यांकडून स्वसहाय्यता गट / बचत गट / महा-ई सेवा केंद्र आकारतील. लाभार्थ्यांस रीतसर पावती देण्यात यावी. लाभार्थी नोंदणीचा सुयोग्य अभिलेख स्वसहाय्यता गट / बचत गट यांनी अद्यावत ठेवावा. बचत गट आर्थिक वर्ष २०१२-१३ पासून पुढे असा सेवा आकार घेऊ शकतील. त्यांना आर्थिक वर्ष २०११-१२ करीता सेवा आकार घेता येणार नाही.

१३. नैसर्गिक मृत्यू व अंशतः अपंगत्वाच्या दाव्याच्या भरपाई प्रकरणी स्वसहाय्यता गट / बचत गट यांना रुपये २५०/- इतके सेवाशुल्क शासनामार्फत देण्यात येईल. तसेच अपघाती मृत्यू दाव्याच्या भरपाई प्रकरणी शासनामार्फत स्वसहाय्यता गट / बचत गट यांना रुपये ५००/- इतके सेवाशुल्क देण्यात येईल. यासाठी आवश्यक ते अनुदान शासनाकडून जिल्हाधिकारी यांना वितरित करण्यात येईल व भरपाई दावा मंजूर झाल्यानंतरच स्वसहाय्यता गट / बचत गट यांना सेवाशुल्क अदा करण्यात यावे. या सेवाशुल्क अदायगीचा सविस्तर अभिलेख तहसीलदार कार्यालयाने ठेवावा. सेवा आकारणीचा खर्च मागणी क्रमांक : एन-३,२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४-ठेव संलग्न विमा योजना शासकीय भविष्य निर्वाह निधी (००)(०१) आम आदमी विमा योजना (योजनेतर) (२२३५ ३३८२),५०-इतर खर्च या लेखाशिर्षामधून त्या त्या आर्थिक वर्षामध्ये मंजूर केलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

१४. लाभार्थ्यांना महा ई-सेवा केंद्रामार्फत देखील अर्ज भरता येतील. त्याबद्दल महा ई-सेवा केंद्रास रुपये २०/- इतके सेवाशुल्क लाभार्थ्यांकडून आकारता येईल. संगणक सांकेतांक क्र. 201112071213 30001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दिनेश वाघमारे )
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सचिव, भारत सरकार वित्त मंत्रालय आर्थिक कार्यविभाग, जीवन दीप भवन, तिसरा मजला, १० पार्लमेंट स्ट्रीट, नवी दिल्ली ११०००१,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे अध्यक्ष,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) १ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सचिव, भारतीय आयुर्विमा महामंडळ (पी. ॲण्ड जी. एस. युनिट) योगक्षेम, मुंबई,
भारतीय आयुर्विमा महामंडळ (पी. ॲण्ड जी. एस. युनिट सर्व),
सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
संचालक / उपसंचालक, माध्यमिक / उच्च माध्यमिक,
अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,
सहसचिव / उपसचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.

------------